**नवी मुंबई क्षेत्रातील सिडको हद्दीत विशेष आर्थिक क्षेत्र विकसित करण्यासाठी स्ट्रेटेजिक पार्टनर निवडणे**

**महाराष्ट्र शासन**
**नगर विकास विभाग,**
**शासन निर्णय क्रमांक: सिआयडी-३३०२/७१५/प्र.क्र.०३/नवि-१०**
**मंत्रालय, मुंबई ४०० ०३२, दिनांक: ३० जानेवारी,२००४.**

**प्रस्तावना:-** नवी मुंबई येथील सिडको कार्य क्षेत्रात केंद्र शासनाच्या आयात निर्यात धोरणाच्या अनुषंगाने विशेष आर्थिक क्षेत्र स्थापन करण्याचा शासनाचा प्रस्ताव आहे. केंद्र शासनाने दिनांक ५ मे,२००० च्या पत्राव्दारे नवी मुंबई येथे विशेष आर्थिक क्षेत्र उभारण्यास तत्वत: मान्यता दिली आहे. दिनांक १५ सप्टेंबर,२००२ च्या शासन निर्णयानुसार महाराष्ट्र शासनाने नवी मुंबई विशेष आर्थिक क्षेत्राच्या प्रकल्पाची अंमलबजावणी करण्यासाठी सिडकोची नोडल एजन्सी म्हणून नियुक्ती केली आहे.

केंद्र शासनाच्या वाणिज्य मंत्रालयाची नवी मुंबई येथील स्थापन करावयाच्या विशेष आर्थिक क्षेत्रास दिनांक १५.२.२००२ रोजी अधिकृत मान्यता मिळाली आहे. तसेच महाराष्ट्र शासनाने देखील शासन निर्णय दिनांक ११ सप्टेंबर,२००२ अन्वये नवी मुंबई विशेष आर्थिक क्षेत्र उभारण्यास मान्यता दिली आहे.

सदर नवी मुंबई विशेष आर्थिक क्षेत्र सिडकोने संयुक्त उपक्रमाव्दारे (Joint Sector Venture) विकसित करण्यासाठी निविदा प्रक्रिया शक्यतो तीन महिन्यांत पूर्ण करावी, असा दिनांक ११.९.२००२ च्या मंत्रीमंडळ बैठकीत निर्णय घेण्यांत आला होता. त्यास अनुसरुन जागतिक स्तरावर निविदा मागवून आवश्यकती निविदा प्रक्रिया सिडकोने पूर्ण केली व नवी मुंबई विशेष आर्थिक क्षेत्र विकसित करण्याकरिता स्ट्रेटेजिक पार्टनर नेमण्याचा प्रस्ताव सिडकोने शासनास सादर केला होता. त्यास अनुसरुन शासनाने पुढील प्रमाणे निर्णय घेतला आहे.

**शासन निर्णय:-** मे.व्हिडिओकॉन इन्टरनॅशनल लिमिटेड कन्सोर्टियम यांचे निविदेमधील प्रती हेक्टरी दर हे सर्वात जास्त असून स्पर्धात्मक ((competitive) असल्यामुळे त्यांना नवी मुंबई विशेष आर्थिक क्षेत्राचे काम करण्यास सिडकोसोबत संयुक्त प्रकल्प स्थापन करण्यासाठी स्ट्रेटेजिक पार्टनर म्हणून नेमण्यास या शासन निर्णयाव्दारे मान्यता देण्यांत येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

**( आर. आर. जाधव )**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन.**

**प्रति,**

मा.मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव

**कृ.मा.प.**

मुख्य सचिवांचे उप सचिव
व्यवस्थापकीय संचालक, सिडको लि.
प्रधान सचिव (उद्योग), उद्योग,ऊर्जा व कामगार विभाग, मंत्रालय, मुंबई
प्रधान सचिव (लेखा व कोषागारे), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.
मुख्य व्यवस्थापक (वि.आ.क्षे.), सिडको.
निवडनस्ती (नवि-१०).